(4)

अचानक नाहीशा झालेल्या व ठावठिकाणा माहीत नसलेल्या शासकीय कर्मचारी/निवृत्तिवेतनधारक यांच्या कुटुंबियांना कुटुंब निवृत्तिवेतन आणि उपदान मंजूर करण्याबाबत.

.............. स्पष्टीकरण.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
परिपत्रक क्रमांक :सेनिवे-1094/156/सेवा-4,
मंत्रालय, मुंबई-400 032. दिनांक 26 जून 1995.

## परिपत्रक

अचानक नाहीशा झालेल्या व ठावठिकाणा माहित नसलेल्या शासकीय कर्मचारी/निवृत्तिवेतनधारक यांच्या कुटुंबियांना शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-1089/491/सेवा-4, दिनांक 5 जुलै, 1991 व शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : सेनिवे-1093/180/सेवा-4, दिनांक 7 ऑक्टोबर, 1993 अनुसार त्यात नमूद केलेल्या शर्तींची पूर्तता होत असेल तर कुटुंब निवृत्तिवेतन व उपदान प्रदान केले जाते. महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर यांनी या आदेशांची अंमलबजावणी होत असताना, येणारे विवक्षित मुद्दे शासनाच्या निदर्शनास आणले आहेत. हे मुद्दे विचारात घेऊन यासंबंधात शासन खालीलप्रमाणे खुलासा करीत आहे.

| मुद्दे | खुलासा |
|---|---|
| 1) बेपत्ता शासकीय कर्मचा-याच्या मृत्यूचा दिनांक कोणता समजण्यात यावा? तो कर्मचारी बेपत्ता झाल्याचा दिनांक, की पोलीस प्राधिका-याकडे प्रथम खबरी अहवाल नोंदविल्याचा दिनांक, की प्रत्यक्षात बेपत्ता झाल्याच्या दिनांकापासून सात वर्षांचा कालावधी ज्या दिनांकाला पूर्ण झाला असेल तो दिनांक की प्रथम खबरी अहवाल नोंदविल्याच्या दिनांकापासून सात वर्षांचा कालावधी ज्या दिनांकाला पूर्ण झाला असेल तो दिनांक? | या संदर्भात शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक सेनिवे-1093/180/सेवा-4, दिनांक 7 ऑक्टोबर, 1993 च्या तरतूदींकडे लक्ष वेधण्यांत येत आहे. सदर शासन निर्णयाद्वारे स्पष्ट करण्यात आले आहे की, कुटुंब निवृत्तिवेतनाचे उपार्जन ( accrual ) प्रथम खबरी अहवाल नोंदविल्याच्या दिनांकापासून किंवा बेपत्ता कर्मचा-याच्या रजेच्या समाप्तीच्या दिनांकापासून यापैकी जो नंतरचा असेल त्या दिनांकापासून केले जाईल. हे लक्षात घेता शासकीय कर्मचा-याच्या मृत्यूचा दिनांक हा कुटुंबनिवृत्तिवेतनाच्या उपार्जनाच्या दिनांकाच्या लगतपूर्वीचा दिनांक राहील. |
| 2) शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक 5-7-91 च्या परिच्छेद-3 नुसार ज्या प्रकरणी सात वर्षांचा कालावधी उपरोक्त आदेश निर्गमित होण्याच्या दिनांकापूर्वीच पूर्ण झाला असेल किंवा प्रथम खबरी अहवाल ( FIR ) उपरोक्त आदेश निर्गमित होण्याच्या दिनांकापूर्वीच नोंदविला गेला असेल आणि जेथे एक वर्षाचा कालावधी अगोदरच पूर्ण झालेला असेल, अशा प्रकरणी, वरील आदेश, निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून म्हणजेच दिनांक 5-7-91 | शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक 7-10-93 अन्वये स्पष्ट केल्याप्रमाणे, कुटुंबनिवृत्तिवेतन उपार्जन झाल्याच्या दिनांकापासून प्रदेय राहील. |

पासून लागू ठरतील. तथापि शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक 7-10-93 मध्ये नमूद करण्यात आले आहे की, कुटुंब निवृत्तीवेतन जरी प्रथम खबरी अहवाल नोंदविल्याच्या दिनांकापासून 1 वर्षाच्या कालावधीनंतर अनुज्ञेय ठरणार असले तरी त्याचे उपार्जन ( accrual ) मात्र प्रथम खबरी अहवालाच्या ( FIR ) दिनांकापासून केले जाईल.

हे लक्षात घेता कुटुंब निवृत्तिवेतन प्रथम खबरी अहवाल नोंदविल्याच्या दिनांकापासून देय ठरेल की, दिनांक 5 जुलै, 1991 पासून देय ठरेल?

) पोलीस प्राधिकाऱ्याकडे प्रथम खबरी अहवाल नोंदविल्याच्या दिनांकापासून एक वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्याचा दिनांक किंवा दिनांक 5-7-91, यापैकी जो नंतरचा दिनांक असेल त्या दिनांकापासून प्रत्येक प्रकरणी वाढीव दराने कुटुंब निवृत्तिवेतनाची रक्कम अनुज्ञेय ठरेल अशी धारणा आहे.

धारणा बरोबर नाही. शासकीय कर्मचा-याच्या नाहीशा होण्याच्या दिनांकापासून सात वर्षांच्या आत त्याचा मृत्यू झाला आहे असे निर्णायकरित्या सिध्द झाल्याच्या दिनांकापासून किंवा कर्मचारी नाहीसा झाल्याच्या दिनांकापासून सात वर्षांचा कालावधी ज्या दिनांकाला पूर्ण होईल त्या दिनांकापासून संबंधित कर्मचा-याच्या कुटुंबीयास वाढीव दराने कुटुंब निवृत्तिवेतन अनुज्ञेय ठरेल. अन्य प्रकरणी प्रथम खबरी अहवाल नोंदविल्याच्या दिनांकापासून कर्मचा-याचा मृत्यू झाला आहे असे निर्णायकरित्या सिध्द होईपर्यन्त किंवा सात वर्षांचा कालावधी पूर्ण होईपर्यन्त, यापैकी जे अगोदर घडेल त्या दिनांकापर्यन्त सर्वसाधारणदराने कुटुंब निवृत्तिवेतन अनुज्ञेय ठरेल.

4) नियमानुसार अनुज्ञेय असलेली मृत्यू उपदानाची रक्कम प्रथम खबरी अहवाल नोंदविल्याच्या दिनांकापासून एका वर्षाचा कालावधी पूर्ण झाल्याचा दिनांक किंवा दिनांक 5-7-91, यापैकी जो नंतरचा दिनांक असेल, त्या दिनांकापासून देय होईल का?

ज्या प्रकरणी, शासकीय कर्मचारी नाहीसा होण्याच्या दिनांकापासून सात वर्षांचा कालावधी पूर्ण होण्यापूर्वीच संबंधित शासकीय कर्मचा-याचा मृत्यू झाला आहे असे निर्णायकरित्या सिध्द झाले असेल अशाच प्रकरणी, शासकीय कर्मचा-याचा मृत्यू सिध्द झाल्याच्या दिनांकास नियमानुसार अनुज्ञेय ठरणारी मृत्यू उपदानाची रक्कम देय ठरेल. अन्य प्रकरणी, फक्त सेवानिवृत्ती उपदान देय ठरेल. तथापि, शासकीय कर्मचा-याचा मृत्यू झाला आहे असे निर्णायकरित्या सिध्द झाल्यानंतर किंवा कर्मचारी नाहीसा झाल्याच्या दिनांकापासून सात वर्षानंतर मृत्यू उपदान व सेवा निवृत्ती उपदान यामधील फरकाची रक्कम देय ठरेल.

| | | |
|---|---|---|
| | सात वर्षांच्या कालावधीत प्राधिकृत करण्यात येणारे निवृत्तिवेतनविषयक लाभ हे संबंधित निवृत्तिवेतनधारक नाहीसा होण्यापूर्वी तो घेत असलेल्या निवृत्तीवेतनाइतके असतील की वाढीव दराच्या कुटुंब निवृत्तिवेतनाइतके असतील? | वरील मुद्दा क्रमांक-1 च्या संदर्भात देण्यात आलेल्या स्पष्टीकरणानुसार कुटुंब निवृत्तिवेतन, देय ठरेल. तथापि म.ना.से. (निवृत्तिवेतन) नियम, 1982 च्या नियम 116(4) च्या तरतूदीनुसार कोणत्याही प्रकरणी सात वर्षांच्या कालावधीत वाढीव दराने अनुज्ञेय ठरणारी कुटुंब निवृत्तीवेतनाची रक्कम, सेवानिवृत्तीनंतर प्राधिकृत करण्यांत आलेल्या निवृत्तिवेतनापेक्षा अधिक असणार नाही. |
| 6) | शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक 5-7-91 च्या आदेशातील परिच्छेद क्र.9 नुसार जर कुटुंब निवृत्तिवेतनाच्या दराचा निवृत्तिवेतन प्रदान आदेशात उल्लेख करण्यात आला असेल तर बेपत्ता कर्मचा-यांच्या कुटुंबियांकडून आवश्यक ते क्षतीपूर्ती बंधपत्र ( Indemnity Bond ) प्राप्त करुन घेतल्यानंतर त्यांना कुटुंबनिवृत्तीवेतनाचे प्रदान विभागाकडून परस्पर केले जाणे आवश्यक आहे. तथापि, कोषागार अधिकारी अशी प्रकरणे महालेखापालांना संदर्भित करतात तर अशी प्रकरणे महालेखापालांना पाठविली जाणे आवश्यक आहे किंवा कसे? | होय. |
| 7) | शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक 5 ,जुलै, 1991 च्या परिच्छेद 11 मध्ये नमूद करण्यात आले आहे की, जी प्रकरणे यापूर्वीच निकालात काढलेली असतील, तेथे लाभार्थींना फायदेशीर असल्याखेरीज अशा प्रकरणांचे पुनर्विलोकन करण्यांत येऊ नये. या तरतूदी विहित करण्यामागे शासनाचा हेतू असा असावा की जी प्रकरणे यापूर्वीच तेव्हा अस्तित्वात असलेल्या नियमानुसार निकालात काढण्यात आली असतील (म्हणजेच ज्या प्रकरणी 7 वर्षांचा कालावधी दिनांक 5-7-91 रोजी संपुष्टात आला असेल अशी प्रकरणे) अशा प्रकरणांचे पुनर्विलोकन करण्यात येऊ नये. | जी प्रकरणे यापूर्वीच निकालात काढण्यात आलेली असतील तेथे लाभार्थींना फायदेशीर असल्याखेरीज अशा प्रकरणांचे पुनर्विलोकन करण्यात येऊ नये. सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना विनंती करण्यात येते की त्यांनी अशा प्रकरणांची छाननी करुन ती प्रकरणे यथास्थिती महालेखापाल, मुंबई/नागपूर यांचेकडे सुधारणा करण्यासाठी पाठवावीत. |
| 8) | बेपत्ता शासकीय कर्मचा-याच्या प्रत्यक्षात गैरहजेरीचा कालावधी ( Physical Absence ) म्हणजेच नाहीसा होण्याच्या | होय. |

दिनांकापासून प्रथम खबरी अहवाल (एफ.आय.आर.) नोंदविल्याच्या दिनांकापर्यन्तचा कालावधी विभागाने नियमित करणे आवश्यक आहे किंवा कसे?

या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

वसंत चौधरी,
शासनाचे अवर सचिव.

Grant of Family Pension and Gratuity to the Families of Government Servants/Pensioners who disappear suddenly and whose whereabouts are not known

Clarification.

**Government of Maharashtra,**
Finance Department,
Circular No.PEN-1094/156/SER-4,
Mantralaya, Bombay-400 032 dated the 26th June 1995.

## CIRCULAR

In accordance with Government Resolution, Finance Department, No.PEN-1089/491/SER-4, dated the 5th July 1991 and Government Resolution, Finance Department, No.PEN-1093/180/SER-4, dated 7-10-93, the families of the Government servants/pensioners who disappear suddenly and whose whereabouts are not known are paid family pension and gratuity, subject to fulfillment of conditions mentioned therein. While implementing these orders certain points have been brought to the notice of the Government by the Accountant General, Maharashtra, Bombay/Nagpur. Government have considered these points and is pleased to clarify as under -.

| Point | Clarification |
|---|---|
| 1) Whether the date of death of the Government servant is to be treated as the date from which he is reported to be actually missing or the date on which the First Information Report (F.I.R.) was lodged with the Police or the date on which the period of seven years expires from the date of actual missing or the date of lodging the First Information Report? | In this connection attention is invited to the orders contained in Government Resolution, Finance Department, No.PEN-1093/180/SER-4, dated 7th October 1993 wherein, it has been clarified that the family pension will accrue from the date of lodging the F.I.R. or expiry of leave of the Government servant, who has disappeared, whichever is later. In view of this the date of death of the Government servant will be the date preceding the date of accrual of family pension. |
| 2) As per para 3 of the Government Resolution, Finance Department, dated 5-7-91 the family pension in cases, where period of 7 years have already elapsed or FIR lodged prior to issue of these orders and where one year has already been elapsed, in such cases the orders are applicable from 5-7-1991 i.e. from the date of issue of Government Resolution. However, as per Government Resolution, Finance Department dated 7-10-93, | In such cases, family pension will be payable from the date of accrual of Family Pension as clarified vide Government Resolution, Finance Department dated 7-10-1993. |

it is stated that family pension though admissible after one year from the date of F.I.R., the date of payment of family pension is date of F.I.R.

In view of this whether the family pension will be payable from the date of F.I.R. or 5-7-91 in above cases?

3) It is presumed that enhanced rate of family pension is admissible to the widow of every Government servant after expiry of one year's period from the date of lodging of the first Information report or from 5-7-91, whichever is later.

The presumption is not correct. The family pension at the enhanced rate is admissible from the date of actual death, where death of the Government servant is conclusively established, or after the expiry of seven years from the date of missing. In other cases, the Family Pension is admissible at the normal rate to the family of missing Government servant from the date the F.I.R. is lodged till the death is conclusively established or upto 7 years from the date of missing, whichever is earlier.

4) Whether the death gratuity as admissible under the rules can be paid to the widow of the missing Government servant after the expiry of one year period from the date of lodging the FIR or from 5-7-1991, when the Government Resolution was issued, whichever is later?

Death Gratuity as admissible under the rules can be paid, only in cases, where the death is conclusively established before expiry of seven years period from the date of missing. In other cases only Retirement Gratuity is payable. However, after the death is conclusively established or on the expiry of seven years from the date of missing, the difference between the Retirement Gratuity and Deathe Gratuity can be paid.

5) Whether during the period of seven years the pensionary benefits to be authorised will be equal to the service pension which the pensioner was drawing immediately before missing or the family pension at the enhanced rate?

The family pension will be payable as per clarification to point No.1 above. However, as per the provisions of Rule 116(4) of the Maharashtra Civil Services (Pension) Rules, 1982, in no case, the amount of family pension at the enhanced rate should exceed the pension authorised to the Government servant on retirement.

पृ-२३

| | |
|---|---|
| 6) As per para 9 of the Government Resolution, Finance Department, dated 5-7-91, the family pension, if incorported in pension payment order will be payable by Department directly to the family of absconding pensioner after obtaining bond. However, Treasury Officer refers such cases to the Accountant General's office. Whether these cases are required to be routed through the Accountant General by the Department? | Yes. |
| 7) In para 11 of Government Resolution, Finance Department, dated 5-7-91, it is stated that cases already settled will not be required to reopen unless such reopening will be advantageous. It appears that Government's intention is that cases, which are already covered by existing rules (i.e. where period of 7 years elapsed on 5-7-91) will not be reopened. | The cases, which are already settled need not be re-opened unless such a re-opening is advantageous to the beneficiaries. All Administrative Departments of the Mantralaya are, therefore, required to scrutinise such cases and refer them to the Accountant General, Maharashtra, Bombay/Nagpur, as the cases may be, for revision. |
| 8) Whether the physical absence i.e. from the date of missing to the date of lodging complaint i.e. F.I.R. is required to be regularised by Department? | Yes. |

By order and in the name of the Governor of Maharashtra.

V.W.CHAUDHARI
Under Secretary to Government

------